**दलित वस्त्यांमध्ये नागरी सुविधा पुरविण्याकरिता सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांना सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : झोपसू. २०१०/प्र.क्र.१७७/झोपसू-१अ**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक :- २५ फेब्रुवारी, २०११**

**वाचा :-**

१. मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळाचे जा.क्र.मु.अ./मुंझोसुमं/२८३१/१०, दि.२१.०६.२०१०

२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पुरक २०१०/प्र.क्र.२४०/अर्थसंकल्प ३, दि.३०.१२.२०१०

**प्रस्तावना :**

मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्हयातील गलिच्छ वस्त्यांमध्ये नागरी सुविधा पुरविण्याची कामे हाती घेणे आवश्यक आहे. मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्हयातील मतदार संघात दलित वस्त्यांमध्ये लोकोपयोगी व अत्यावश्यक नागरी सुविधांची कामे करण्यासाठी जसे की सार्वजनिक शौचालये, गटारे, पायवाटा, समाज मंदिर इत्यादीसाठी निधीची आवश्यकता आहे. पुरवणी मागणीव्दारे मंजूर झालेल्या रु.३.०० कोटी निधीपैकी रु.२.४० कोटी एवढा निधी वित्त विभागाने, समाजकल्याण व विशेष सहाय्य विभागांतर्गत विशेष घटक योजनेमधून सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. सदरचा निधी मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्हयामधील मतदार संघातील लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

मुंबई शहरातील दलित वस्त्यांमध्ये **"परिशिष्ट-अ"** मध्ये प्रस्तावित असलेल्या कामासाठी सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षामध्ये रु.२,४०,००,०००/- (रुपये दोन कोटी चाळीस लाख फक्त) इतकी तरतुद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली असल्यामुळे मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ यांनी या मर्यादेच्या अधिन राहून प्रस्तावित कामे करावीत. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास सहाय्यक अनुदान म्हणून वितरीत करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे. :-

१) मुंबई शहर जिल्हयामधील लोकप्रतिनिधींनी सुचविलेली लोकोपयोगी व अत्यावश्यक नागरी सुविधांच्या कामाची तातडी, आवश्यकता, व्यवहार्यता, सुसाध्यता व उपलब्ध निधी विचारात घेऊन, निधी वितरीत करण्यात यावा.

२) झोपडपट्टीवासियांना मोफत पक्की घरे पुरविण्याबाबतच्या योजनांमुळे ज्या ठिकाणी अशा योजना एक दोन वर्षात राबविण्यात येणार आहेत अशा ठिकाणी सदरचा खर्च करु नये.

३) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने आहरण व संवितरण अधिकारी, गृहनिर्माण विभाग यांच्या प्रतीस्वाक्षरीसह सदर रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयात विहित प्रपत्रात या आदेशाच्या प्रतीसह सादर करावे.

४) प्राधिकरणाची संबंधित कागदपत्रे व अनुदानाविषयीचे लेखे महालेखापाल यांनी मागितल्यास ती त्यांचे माहितीकरिता/ पाहणीकरिता सादर करण्यात यावीत.

५) सदर निधी खालील कॅश फ्लोनुसार दरमहा वितरीत करण्यात यावा.

| माहे | फेब्रुवारी २०११ | मार्च २०११ |
|---|---|---|
| **निधी (रु.कोटीत)** | **१.००** | **१.४०** |

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च " २२१६-गृहनिर्माण, ८०-सर्वसाधारण, १०३- (०१) गृहनिर्माण योजना (०१)(०६) झोपडपट्टी स्वच्छता कामे झोपडपट्टी क्षेत्रात राहणा-या अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना नागरी सुविधा पुरविणे (विशेष घटक योजना) (२२१६ २६२८) ३१-सहाय्यक अनुदाने,गृहनिर्माण योजना (पायाभूत सुविधा) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो चालू वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०/११/ व्यय-३ ,दि.२०.०१.२०११ नुसार व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Intranet.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०११०२२३२०१३२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सु.सं.धपाटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
२) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१
३) निवासी लेखा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परीक्षा),
५) महालेखापाल, महाराष्ट्र-२,नागपूर, (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परीक्षा),
६) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
७) वित्त विभाग, अर्थोपाय/व्यय-३/अर्थ-१७ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२
८) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (विघयो-१), मंत्रालय, मुंबई ३२
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
११) नियोजन विभाग, कार्यासन, १४७४, मंत्रालय, मुंबई-३२
१२) अवर सचिव ( लेखा), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) आहरण व संवितरण अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) कक्ष अधिकारी, अर्थसं-१, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५) निवड नस्ती, झोपसू-१अ

## परिशिष्ट - अ

## नागरी दलित वस्तीअंतर्गत वरळी मतदार संघात करावयाच्या कामाची यादी

## गृहनिर्माण विभाग, क्र.झोपसू-२०१०/प्र.क्र.१७७/झोपसू-१ अ, दिनांक २५.२.२०११

| अनु.क्र. | कामाचे नांव |
|---|---|
| १) | सिध्दार्थ नगर, वरळी नाका टेकडी विभाग येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| २) | माया नगर, वरळी नाका टेकडी विभाग येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| ३) | आनंद नगर येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| ४) | भारत नगर नाल्याच्या बाजूला येथे गटारे व पायावाटा बांधणे. |
| ५) | नेहरु सेंटर ते आंबेडकर नगर वरील पुलापर्यंत पेव्हर ब्लॉक बसविणे. |
| ६) | मरीयम्मा नगर येथे क्राँक्रिटीकरण करणे. |
| ७) | रमाबाई आंबेडकर नगर येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| ८) | मेघनगर सानेगुरुजी मार्ग येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| ९) | सानेगुरुजी बी कमिटी येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| १०) | बी.डी.डी.चाळीत पाण्याची लाईन टाकणे. |
| ११) | बी.डी.डी.चाळी परिसरात लादीकरण करणे. |
| १२) | बी.डी.डी. चाळ परिसरात समाज मंदिराचे कामे करणे. |
| १३) | शांतीनगर सात रस्ता येथे लादीकरण करणे. |
| १४) | शांतीनगर येथील शौचालये दुरुस्ती करणे. |
| १५) | साईबाबा नगर धोबीघाट परिसरात मोठया मैदानात लादीकरण करणे. |
| १६) | रामदेव नगर ऑर्थर रोड जेलच्या पाठीमागे ड्रेनेज चे काम करणे. |
| १७) | वरळी किल्ल्याजवळ क्राँक्रिटीकरण करणे. |
| १८) | जिजामाता नगर येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| १९) | अचानक नगर वरळी नाका येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| २०) | भैय्या साहेब आंबेडकर नगर येथे गटारे व पायवाटा बांधणे. |
| २१) | मेघ नगर सानेगुरुजी मार्ग येथे समाजमंदिराचे कामे करणे. |
| २२) | ॲनी बेझंट रोड जवळील मार्कंडेश्वर नगर येथे ड्रेनेज लाईन टाकणे. |